महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगावरील अध्यक्ष तसेच २ सदस्य यांची नेमणूक करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.: सीबीसी-१०/२०२०/प्र.क्र.२०/मावक,**
**मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-३२.**
**दि.२८ ऑक्टोबर, २०२१.**

वाचा :-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, विशेष सहाय्य विभाग, क्र.रामाआ-२००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दि.१ मार्च, २००५.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासउ-१०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ, दि.१३ मार्च, २०१२.

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाने सन २००३-०४ मध्ये सामाजिक न्याय संकल्पनेवर आधारीत अर्थसंकल्प सादर केला होता. त्या अर्थसंकल्पात काही संकल्पना विविध विभागांशी संबंधित असल्याने त्यावर सर्व विभागांशी समन्वय साधून योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता तसेच सामाजिक न्यायाचे तत्व प्रभावीपणे राबविण्यासाठी अनुसुचित जाती जमाती आयोग नेमण्याची घोषणा दि.२२.७.२००३ रोजी विधानसभेत करण्यात आली होती. त्यानुसार शासन निर्णय सामाजिक न्याय सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र.रामाआ-२००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दि.१.३.२००५ अन्वये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती यांच्याकरिता १ अध्यक्ष व ४ अशासकीय सदस्यांचा समावेश असलेल्या महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाचे गठन करण्यात आले असून त्यांची नियुक्ती, त्यांचे वेतन आणि भत्ते व त्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्यात आलेल्या आहेत. तसेच आयोग व शासन यांच्यात कामकाजाबाबत समन्वय साधण्यासाठी प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग व पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची पदसिध्द सदस्य म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. शासन निर्णय, दि.१० जुलै, २०२० अन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग अंतर्गत विविध कायदा/ अधिनियमाद्वारे स्थापित केलेले आयोग/ समित्यांवर नियुक्त केलेले अशासकिय अध्यक्ष/ सदस्य यांच्या नियुक्त्या रद्द करण्यात आलेल्या आहेत. सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगावरील अध्यक्ष व सदस्यांची सर्व पदे रिक्त आहेत. सबब, आता महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगावरील १ अध्यक्ष व २ अशासकीय सदस्यांच्या नेमणूकीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगावरील रिक्त असलेल्या अध्यक्ष व सदस्य पदांवर खालीलप्रमाणे नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नांव | महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगावरील नेमणूकीचे पद |
|---|---|---|
| १ | श्री.ज.मो. अभ्यंकर | अध्यक्ष (राज्यमंत्री दर्जा) |
| २ | श्री.आर.डी. शिंदे | सदस्य (सेवा) |
| ३ | श्री.किशोर मेढे | सदस्य (सामाजिक व आर्थिक) |

शासन निर्णय, दि.१.०३.२००५ मधील तरतूदींच्या अधीन राहून उपरोक्त प्रमाणे महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगाच्या अध्यक्षपदी श्री.ज.मो.अभ्यंकर यांची दि.२९ ऑक्टोबर, २०२१(म.पू) पासून पुढील दीड वर्षाच्या कालावधीकरिता नेमणूक करण्यात येत आहे. तसेच श्री.आर.डी. शिंदे, सदस्य (सेवा) व श्री.किशोर मेढे, सदस्य (सामाजिक व आर्थिक) या दोन्ही सदस्यांची दि.२९ ऑक्टोबर, २०२१(म.पू.) पासून पुढील ३ वर्षाच्या कालावधीकरिता नेमणूक करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाचे अध्यक्ष यांना राज्यमंत्री दर्जा असेल, तसेच सदस्यांना महाराष्ट्र राज्याच्या सचिवांचा दर्जा असेल. उपरोक्त दि.१ मार्च, २००५ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब मध्ये नमूद केल्यानुसार मानधन व शासनाचे सचिवांना अनुज्ञेय असलेल्या सोयी सुविधा तसेच दौऱ्यावर असताना देय असलेले प्रवास भत्ते अनुज्ञेय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९११२००३८६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2021.10.29 11:22:03 +05'30'

**(वि. पुं. घोडके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.
५. सर्व मंत्रालयीन विभागाचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, वरळी, मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२. लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. सर्व विभागीय आयुक्त (महसूल).
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रे (पूर्व), मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. आयुक्त, दिव्यांगकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
१९. सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
२०. सर्व समाजकल्याण अधिकारी, जिल्हापरिषद (गट अ).
२१. श्री.ज. मो. अभ्यंकर, द्वारा चित्रसेन अभ्यंकर, सी-१३०१, मिरा को.ऑप.हौ.सो., मेगा मॉल जवळ, ओशिवारा, अंधेरी (प), मुंबई-१३.
२२. श्री.आर.डी. शिंदे, मोहन प्राईड को.ऑप.हौ.सोसायटी, पोतदार स्कुलजवळ, वायलेनगर, कल्याण (पश्चिम)., जि.ठाणे.
२३. श्री.किशोर मेढे, १३०४, हर्क्युलस, लोढा पॅराडाईज, माजीवडे फ्लायओव्हर शेजारी, ठाणे (प).-
२४. सर्व कार्यासन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवडनस्ती, का. मावक.